**अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला अंतर्गत लघु पाटबंधारे विभाग, बुलढाणा व अंतर्गत ४ उपविभाग एक समुच्चयांने अधीक्षक अभियंता, बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा अंतर्गत वर्ग करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक-आढावा-२००९/११/(३५६/२००९)/आ.(प्रशि)
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १९ मार्च, २०१०.

**वाचा -** शासन पूरकपत्र क्र.आढावा-१००८/१३८७/(३२६/२००९)/आ (प्रशि), दिनांक ५.२.२००९.

प्रस्तावना :-

विदर्भ प्रादेशिक विभागांतर्गत अमरावती विभागामधील सिंचनाचा अनुशेष दूर करण्यासाठी अमरावती विभागात वर्गीकरणाने उपलब्ध करुन देण्यात आलेली कार्यालये व पूर्वी कार्यरत असलेली कार्यालये व त्यांच्याकडील कामाचा भार लक्षात घेता मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, अमरावती यांच्या अधिपत्याखाली असलेल्या पाटबंधारे प्रकल्प व जलसंपत्ती अन्वेषण मंडळ, अमरावती, वाशिम पाटबंधारे मंडळ, वाशिम व अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला या ३ मंडळाच्या अधिपत्याखालील कोणते विभाग व उपविभाग कार्यरत राहतील, त्या संदर्भातील सविस्तर तपशिल उपरोक्त शासन पूरकपत्रान्वये निर्गमित करण्यात आला आहे.

२. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाच्या कार्यक्षेत्राअंतर्गत बुलढाणा जिल्हयातील जिगांव प्रकल्पाचे बांधकामास सुरुवात झालेली आहे. जिगांव प्रकल्प हा मोठा प्रकल्प असून प्रकल्पाची सिंचन क्षमता जून, २०१६ अखेर निर्माण करण्याचे नियोजित आहे. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाच्या विभागांतर्गत अधीक्षक अभियंता, बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा या क्षेत्रिय कार्यालयाच्या नियंत्रणाखाली जिगांव प्रकल्पाचे काम सुरु आहे.

३.   लघु पाटबंधारे विभाग, बुलढाणा या विभागाचे नियंत्रण, अकोला पाटबंधारे प्रकल्प मंडळाकडे असल्यामुळे प्रशासकीय दृष्टया गैरसोईचे आहे. प्रशासकीय दृष्टया सोयीचे व्हावे तसेच, बुलढाणा जिल्हयातील अनुशेष निर्मुलनाच्या दृष्टीकोनातून लघु पाटबंधारे विभाग, बुलढाणा या विभागाचे नियंत्रण बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा कडे सोपविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला या मंडळ कार्यालयाअंतर्गत लघु पाटबंधारे विभाग, बुलढाणा हा विभाग त्याच्या अधिपत्याखालील एकूण ४ उपविभागासह अधीक्षक अभियंता, बुलढाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बुलढाणा या मंडळाचे अधिपत्याखाली, एक समुच्चयाने वर्ग करण्याबाबत या शासन निर्णयान्वये आदेश देण्यात येत आहेत.

२.   हा शासन निर्णय, क्र. वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/९२ मधील तरतूदीनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३१९१७२१३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(शुभांगी आगाशे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक.
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई-१/नागपूर-२
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई-१/नागपूर-२
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.

मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, जलसंपदा विभाग, अमरावती.
अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला
अधीक्षक अभियंता, बुलढाणा पाटबंधारे मंडळ, बुलढाणा
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, बुलढाणा
सर्व कार्यकारी संचालक,
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
(कार्यालयांचे बदलाबाबत आवश्यक ती नोंद घ्यावी)
कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण), संग्रहार्थ
निवड नस्ती धारिका.